**डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ व्या जयंती वर्षानिमित्त क्रांतीस्तंभ महाड जि. रायगड ( महाडची क्रांतीभूमी ) येथील शाहू महाराज सभागृहाचे नुतनीकरणासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सान्यावि-२०१८/ प्र.क्र.१५५/ बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ डिसेंबर, २०१८.

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्र. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सान्यावि-२०१५/ प्र.क्र.१६३/बांधकामे, दि.९/१०/२०१५

२) शासन निर्णय क्र. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. बैठक-२०१६/ प्र.क्र.४७५ /बांधकामे, दि.२४/३/२०१७.

३) आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचे पत्र .सकआ/मावक/ऐति.स्थळ/क्रांस्तम/ २०१७-१८/का.१२/३९११, दि.११/५/२०१८.

**प्रस्तावना :-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त अनुसूचित जाती व नवबौध्द घटकासाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्टया महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे याअंतर्गत दि.९/१०/२०१५ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार मा.मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीची दि.१/८/२०१६ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तासोबतच्या परिशिष्ट “अ” मध्ये अनुसूचित जाती व नवबौध्द घटकासाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्व असलेल्या एकूण २८ ठिकाणे/स्थळांची यादी अंतिम करण्यात आली असून त्यामध्ये क्रांतीस्तंभ, महाड जि. रायगड (महाडची क्रांतीभूमी) येथील शाहू महाराज सभागृह नुतनीकरण या कामासाठी रू.१.०० कोटी इतक्या निधीस संदर्भीय क्र.२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरून संदर्भ क्र.३ अन्वये आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्यामार्फत रू.८५,७७,८५४/- (अक्षरी रूपये पंच्याऐंशी लक्ष सत्याहत्तर हजार आठशे चौपन्न फक्त) इतक्या रकमेचा क्रांतीस्तंभ, महाड जि.रायगड (महाडची क्रांतीभूमी) येथील शाहू महाराज सभागृह नुतनीकरण या कामांसाठीचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाकगाकडे तांत्रिक बाबींची छाननी करण्याकरीता पाठविला असता सार्वजनिक बांधकाम

विभागाने परगिणित केलेल्या रू.८५,१७,७३०/-(अक्षरी रूपये पंच्याऐंशी लक्ष सतरा हजार सातशे तीस फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार, भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीवर्षानिमित्त क्रांतीस्तंभ, महाड जि. रायगड (महाडची क्रांतीभूमी) येथील शाहू महाराज सभागृह नुतनीकरण या कामासाठी ८५,१७,७३०/- (अक्षरी रूपये पंच्याऐंशी लक्ष सतरा हजार सातशे तीस फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

| कामाचे नाव | कामाची बाब | अंदाजित किंमत |
|---|---|---|
| डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती वर्षानिमित्त क्रांतीस्तंभ, महाड जि. रायगड (महाडची क्रांतीभूमी) येथील शाहू महाराज सभागृह नुतनीकरण | शाहू महाराज सभागृह नुतनीकरण | रू.८५,१७,७३०/- |

**अटी व शर्ती** :-

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.
२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
५) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापूर्वी अंदाजपत्रकावर अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, रत्नागिरी तसेच उपभोक्ता विभागाच्या वतीने सक्षम अधिकाऱ्याचे साक्षांकन आवश्यक आहे.
६) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

२. प्रस्तुत कामावरील खर्च हा मागणी क्र. एन-३, २२२५ अनुसूचित जाती व जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१ - अनुसूचित जातीचे कल्याण,७८९- अनुसूचित

जाती घटक योजना, ०२- भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे (योजनांतर्गत-दत्तमत्त) लेखाशिर्ष २२२५ डी८२३ या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या व समन्वयक तथा कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांच्या अधिनस्त असलेल्या निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

३. या करीता आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांनी या कामासाठीचा निधी, विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार त्या त्या टप्प्यावर सदरहू कामाकरीता वितरीत करावा.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय, दि.९/१०/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित समितीस प्राप्त अधिकार तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१५१२०८१४६२२२ असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2018.12.15 12:27:18 +05'30'

(अ.कों.आहिरे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/ नागपूर.
४) कार्यकारी अभियंता तथा समन्वयक, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, रायगड.
६) उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड .
७) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, मुंबई.
८) सहायक आयुक्त, समाजकल्याण, रायगड.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/रायगड.
१०)निवडनस्ती / बांधकामे.